**संकल्पचित्र मंडळ (पूल व इमारती), नवी मुंबईमधील पदे पूल घटक क्र-२, पुणे कार्यालयाकडे वर्ग करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग,**
**शासन निर्णय क्र.ईएसटी-२०१८/प्र.क्र.४९/प्रशासन-१**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक:- २४ ऑगस्ट, २०१८**

**संदर्भ**:- १) सार्वजनिक बांधकाम विभागाचा शासन निर्णय क्र.ईएसटी-१००६/प्र.क्र.७३/प्रशासन-१ दि.२८.०६.२००६
२) सार्वजनिक बांधकाम विभाग शासन शुध्दीपत्रक क्र.ईएसटी-१००६/ (प्र.क्र.७३/०६)/ प्रशासन-१ दि.२३.११.२००६
३) अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ (पूल व इमारती), कोकण भवन नवी मुंबई यांचे क्र. अअसंचिमं/१३३३/२०१८ दि. २१.०७.२०१८ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयान्वये अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ (पूल व इमारती), नवी मुंबई यांच्या अखत्यारितील पूल घटक क्र. २ या घटक कार्यालयाचे कार्यरत व रिक्त पदांसह नवी मुंबई येथून पुणे येथे स्थलांतरण करण्यात आले आहे. तसेच संदर्भाधीन क्र. २ च्या शासन शुध्दीपत्रकान्वये पूल घटक क्र. २ या कार्यालयातील आकृतीबंधानुसार मंजूर १५ पदांपैकी वर्ग-१ मधील ७ पदे, वर्ग-२ मधील १ पद व वर्ग -३ मधील १ पद अशी एकूण ९ पदे पुणे कार्यालयाकडे वर्ग करण्यात आली आहेत. उर्वरित वर्ग-३ मधील ४ पदे व वर्ग -४ मधील २ पदे अशी एकूण ६ पदे प्रशासकीय कारणास्तव पूल घटक क्र. २ कार्यालयाकडे वर्ग करण्यात आली नव्हती. सद्य:स्थितीत सदर ६ पदांची आवश्यकता विचारात घेऊन, कार्यकारी अभियंता, पूल घटक-२ पुणे कार्यालयाकडे वर्ग करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ (पूल व इमारती), नवी मुंबई यांच्या अखत्यारितील पूल घटक-२ कार्यालयासाठी आकृतीबंधानुसार मंजूर करण्यात आलेल्या १५ पदांपैकी पूल घटक-२ या कार्यालयाकडे वर्ग करावयाची राहिलेली खालील नमूद ६ पदे वर्ग करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजुरी देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **पदनाम** | **कार्यकारी अभियंता, पूल घटक-२, पुणे यांचेकडे वर्ग करावयाची पदे** |
|---|---|---|
| १. | अनुरेखक | ३ |
| २. | लघु-टंकलेखक | १ |
| ३. | लोहमुद्रक | १ |
| ४. | शिपाई | १ |
| | **एकूण** | **६** |

२. याबाबत संबंधित कोषागार कार्यालयाने वेतन आणि आहरण व संवितरण सुलभतेने होण्याच्या अनुषंगाने योग्य ती कार्यवाही करावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०८२४१५३०५७३९१८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nisha Manohar Mahajan

Digitally signed by Nisha Manohar Mahajan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=PWD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9a9f1749dec86c69520dc99c8a73d64e830153ee031b1b93c743e21a94cd3e93, serialNumber=78a137191efea41da17c39ba5785218ceb91615a2fe9adace7540ad0ac40f348, cn=Nisha Manohar Mahajan
Date: 2018.08.24 15:33:04 +05'30'

**(नि. म. महाजन)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ३२.
२. सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
३. सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
४. प्र. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
६. महालेखाकार (लेखा व हकदारी)-II , महाराष्ट्र राज्य, नागपूर
७. सर्व सह सचिव, उप सचिव सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
८. सर्व अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
९. अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ (पूल व इमारती), नवी मुंबई
१०. कार्यकारी अभियंता, पूल घटक क्र. २ पुणे
११. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१२. अधिदान व लेखा अधिकारी, वान्द्रे (पूर्व), मुंबई.
१३. अधिदान व लेखा अधिकारी, पुणे.
१४. जिल्हा कोषागार / उपकोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१५. कार्यासन प्रशासन-१, सार्वजनिक बांधकाम विभाग, (निवडनस्ती)